**महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत (MNREGS) ग्रामपंचायतीने वर्ष २०११-२०१२ मध्ये हाती घ्यावयाच्या कामाचा कृती आराखडा व अंमलबजावणी.**

**महाराष्ट्र शासन**
**शासन परिपत्रक क्रमांक :- संकीर्ण-२०११/प्र.क्र. ८२/पं. रा. ४**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- २९ मार्च, २०११**

**परिपत्रक :-**

केंद्र पुरस्कृत **महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत (MNREGS)** पंचायतींमार्फत **किमान ५०%** कामे होणे अपेक्षित आहे हे आपणां सर्वांना माहितच आहे.

या योजनेंतर्गत ग्राम विकासाकरीता पाहिजे तेवढा निधी प्राप्त होवू शकतो. परंतु जिल्हा परिषदा, पंचायत समित्या व ग्रामपंचायतींमधील पदाधिकारी व अधिकारी या योजनेचा राज्यात पाहिजे तेवढा लाभ घेत नाहीत असे निदर्शनास आले आहे. इतर राज्यांच्या मानाने आपल्या राज्यातील ग्रामीण भागातून ग्रामस्थांची मागणी आहे. असे असतानाही यंत्रणाचा प्रतिसाद दिसत नाही.

पंचायत राज व्यवस्थेतून ही योजना राबविण्याकरीता मुख्य कार्यकारी अधिकारी, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी यांना, पंचायत स्तरावर गटविकास अधिकाऱ्यांना व ग्रामपंचायत स्तरावर सरपंच आणि ग्रामसेवक यांना काही प्रशासकीय अडचणी होत्या, परंतु त्यांचे गेल्या १ - २ महिन्यात पूर्णतः निराकरण करण्यात आलेले आहे. पंचायत राज व्यवस्थेतून या योजना राबविण्याची संपूर्ण जबाबदारी आणि अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी व त्यांचे अधिनस्त यंत्रणेला देण्यात आलेले आहेत. त्यामुळे या वर्षात या योजनेमार्फत पंचायत राज व्यवस्थेतून मोठया प्रमाणावर कामे घेतली जावीत व ग्रामीण भागात मुलभूत सुविधा व विकासाची कामे जास्तीत जास्त प्रमाणात करुन घेण्याच्या दृष्टीने याद्वारे **किमान लक्ष्य** ठरवून देण्याची बाब विचाराधीन होती.

१) हे लक्ष्य **मुख्य कार्यकारी अधिकारी, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, गटविकास अधिकारी** आणि त्यांच्या अधिनस्त सर्व तांत्रिक यंत्रणा आणि **ग्रामपंचायत स्तरावर**

# महात्मा गांधी राष्ट्रीय रो.ह.यो. अंतर्गत (MREGS) वर्ष २०११-१२ चा ७० दिवस कार्यक्रम

मुख्य कार्यकारी अधिकारी व अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी सचिव ग्राम विकास यांना सादर करावयाचा अहवाल **(प्रतिआठवडा)**

जिल्हा परिषद ------------------

अहवाल संकलन : **दरगुरुवारी** स. ११.३० पर्यत उ.मु.का.अ. (ग्रा.प.) जिल्हा स्तरावरुन उप.आ.(विकास) यांचेकडे

**दरगुरुवारी** सायं ४.०० वा उपायुक्त (विकास) यांनी सचिव (ग्रा.वि.) यांचेकडे

**दरशुकवारी** दु. २.०० वा. मा.सचिव (ग्रा.वि.)यांचेकडे (VC)

| कामांचा प्रकार (१) | प्रती काम अंदाजीत रक्कम (२) | प्रती ग्राम पंचायतीने करावयाचे कामाचे उददीष्ट (३) | | जिल्हयाचे उददीष्ट (४) | | अंदाज पत्रकाकरिता जबाबदार अधिकारी (५) | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | भौतीक (अ) | आर्थिक (लक्ष रु) (ब) | भौतीक (सरासरी) (अ) | आर्थिक (लक्ष रु) (ब) | तांत्रिक (अ) | | ग्रामपंचायतींशी प्रशासकीय समन्वय, प्रशासकीय मान्यता, व सर्व मंजूर कामे शेल्फवर येतील यादृष्टीने समन्वय (ब) | |
| | | | | | | तालुका स्तर | जिल्हा स्तर | तालुका स्तर | जिल्हा स्तर |
| वैयक्तिक विहीरी (दारिद्रय रेषेखालील, अनु.जाती / अनु.जमाती, अल्प व अत्यल्प भूधारक, इंदिरा आवास योजनेचे लाभार्थी) | २ लक्ष प्रती काम | १० | २० | एकू ण विहीरी = ग्रा.प. संख्या X १० | ग्रा.पं.संख्या X २० लक्ष = एकूण खर्च | कनिष्ठ अभि. उप अभि. ल.पा./ पा.पु. | अधि. अभि ल.पा. / पा.पु. | वि.अ.(पंचा.) गट वि.अ. | मु.का.अ./ अति.मु.का.अ. |
| रोपवाटीका | २ लक्ष प्रती रोपवाटीका | १ | २ | ग्रा.प.संख्या X १ = एकूण कामे संख्या | ग्रा.पं.संख्या X ४ लक्ष = एकूण खर्च | वि.अ. (शेती)/शेती अधिकारी पं.स | जिल्हा कृषि अधिकारी ADO | वि.अ.(पंचा.) / ग.वि.अ. | मु.का.अ./ अति.मु.का.अ. |
| वृक्षारोपण | २ लक्ष प्रती काम | २ | ४ | ग्रा.प. संख्या X २ = एकूण कामे संख्या | ग्रा.पं.संख्या X ४ लक्ष = एकूण खर्च | वि.अ. (शेती)/शेती अधिकारी पं.स | जिल्हा कृषि अधिकारी ADO | वि.अ.(पंचा.) / ग.वि.अ. | मु.का.अ./ अति.मु.का.अ. |
| शेत / पाणंद / अंतर्गत गाव रस्ता ६०:४० | ५ लक्ष प्रती काम | २ | १० | ग्रा.प. संख्या X २ = एकूण कामे संख्या | ग्रा.पं.संख्या X १० लक्ष = एकू ण खर्च | शाखा अ. / उप अ. (बांध.) | कार्य. अभि. / (बांध.) | वि.अ.(पंचा.) / ग.वि.अ. | मु.का.अ./ अति.मु.का.अ. |
| गांव तलाव /पाझर तलावातील गाळ राखणे | २ लक्ष | २ | ४ | ग्रा.प. संख्या X २ = एकूण कामे संख्या | ग्रा.पं. संख्या X ४ लक्ष = एकूण खर्च | शाखा अ. / उप अ. ल.पा. (पा.पु.) | कार्य अभि. / ल.पा. (पा.पु.) | वि.अ.(पंचा.) / ग.वि.अ | मु.का.अ./ अति.मु.का.अ. |
| राजीव गांधी पंचायत भवन | १० लक्ष | १ | १० | ग्रा.प. संख्या X १ = एकूण कामे संख्या | ग्रा.पं. संख्या X १० लाख = एकूण खर्च | उप.अ./ बांधकाम | कार्य.अ. (बांधकाम) | वि.अ. (पं.चा.) / ग.वि.अ. | मु.का.अ./ अति.मु.का.अ. |
| | | | | | | | | | |
| | एकूण | १८ | ४० लक्ष | १७ कामे | ३८ लाख | | | | |

सरपंच, ग्रामसेवक व ग्रामपंचायतीच्या कमिटीची राहील याची नोंद घ्यावी. वरील सर्व अधिकाऱ्यांच्या वार्षिक मुल्यांकनाचा हा भाग राहिल तर पदाधिकाऱ्यांना सुध्दा याद्वारे महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती कायदा १९६० च्या **उप कलम १** नुसार आणि **ग्रामपंचायतींना मुंबई ग्रामपंचायत कायद्याच्या कलम १५३ - अ** नुसार या विकास कामांत खाली नमूद केल्याप्रमाणे कृती करण्याचे निदेश देण्यात येत आहे.

**२)** प्रत्येक ग्रामपंचायतीच्या कार्यक्षेत्रात या वर्षी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत कार्यक्रम हाती घेण्यासाठी **खालीलप्रमाणे किमान लक्ष्य ठरवून देण्यात येत आहे.**

i) **रोपवाटीका -** प्रत्येक ग्रामपंचायतींनी त्यांच्या कार्यक्षेत्रात **किमान एक रोपवाटिका** पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम अभियानांतर्गत करावयाच्या वृक्षलागवडीचा विचार करुन स्थापित करावयाची आहे. **२०००** पेक्षा जास्त लोकसंख्या असलेल्या ग्रामपंचायतींनी **किमान एका ठिकाणी रोपवाटिका** रु. २ लाखापर्यंत त्यांचे कार्यक्षेत्रात स्थापित करावयाच्या आहेत. या रोपवाटिकांचा उपयोग येत्या पावसाळयात वृक्षलागवड करण्यासाठी व्हावा यादृष्टीने हे परिपत्रक मिळताच त्वरित प्रस्ताव तयार करुन त्याला तांत्रिक मान्यता **विस्तार अधिकारी (कृषी)** पंचायत समिती अथवा **शेती अधिकारी,** पंचायत समिती यांचेकडून घ्यावी. **जिल्हा कृषी अधिकाऱ्यांनी** अशी तांत्रिक मान्यता सर्व ग्रामपंचायतींना तातडीने देण्यात येईल यादृष्टीने समन्वय करावा.

ii) **वृक्षारोपण -** वृक्षारोपणाबाबत जलसंधारण व रोहयो विभागाने सविस्तर सूचना यापूर्वीच निर्गमित केलेल्या आहेत. सर्व ठिकाणी वृक्षारोपण करण्यासाठी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेखाली लागलीच प्रस्ताव करुन तो ८ दिवसांत शेल्फवर तयार ठेवावा. या प्रकल्पांतर्गत वृक्षलागवडीचे खड्डे खणण्याची सुरुवात या कामांना तांत्रिक व प्रशासकीय मान्यता मिळवून त्वरित सुरु करावी, जेणेकरुन पावसाच्या सुरुवातीलाच, अंदाजे **जून - जुलै** महिन्यात प्रत्यक्ष वृक्षारोपण करता येईल. या योजनेंतर्गत वृक्षारोपणासाठी **रोपे, खड्डे खणणे** व त्यानंतर निगा राखण्यासाठी निधी उपलब्ध होतो. त्याचा पुरेपुर वापर ग्रामपंचातींनी करावयाचा आहे व वर नमूद केलेल्या **मुद्दा क्रमांक १** मधील अधिकाऱ्यांनीच तातडीने आवश्यक मान्यता दयावयाच्या आहेत. प्रत्येक ग्रामपंचायतींनी **किमान रु. ४ लाखांची** कामे या वृक्षारोपण कार्यक्रमांतर्गत करावयाची

महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
ग्राम विकास विभागातील सर्व सह / उप सचिव.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
ग्राम विकास विभागातील सर्व कार्यासने व रोखशाखा
निवड नस्ती, कार्यासन पं.रा.-४ (२२), ग्राम विकास व जलसंधारण विभाग

आहेत. यासाठी त्वरित ग्रामपंचायतीने प्रस्ताव करुन तो शेल्फवर तयार ठेवण्याची व्यवस्था करावी.

iii) **शेत, पाणंद गावांतर्गत रस्ते** - ग्रामीण भागात, विशेषत: ग्रामपंचायतींकडून अशा रस्त्यांना प्रचंड मागणी आहे व राज्य शासनाकडून यासाठी निधी प्राप्त व्हावा म्हणून विनंती करण्यात येते. परंतु महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत **पाणंद, शेत रस्त्यांना** परवानगी देण्यात आलेली आहे. यासाठी प्रत्येक ग्रामपंचायतींतर्गत **रु. १० लक्ष** पर्यंतची दोन कामे हाती घेण्यासाठी कार्यवाही करावी. शाखा अभियंता / उप अभियंता यांच्याकडून तांत्रिक मान्यता घेवून ग्रामपंचायतीने प्रस्ताव शेल्फवर घेवून कामे त्वरित सुरु करावीत. गावातील मजूर आणि श्रमदान करु इच्छिणाऱ्या इतर घटकांनी (ज्यांना जॉबकार्ड घेवून श्रमकामे करण्यात कुठलाही प्रत्यवाय नाही.) या कामांना पावसाळयापूर्वी सुरुवात करुन ती पूर्ण करावीत. यासाठी गावातील जॉबकार्डधारक अथवा अंगमेहनत करण्याची तयार असणाऱ्या प्रत्येक कुटुंबाला **१०० दिवसांपर्यंत** या योजनेअंतर्गत काम करण्याची मुभा आहे. शिवाय पंचक्रोशीतील जॉबकार्ड धारण करणारी व्यक्तीसुध्दा या कामात सहभागी होवू शकतात. पंचक्रोशीतील गावांना परस्परांच्या सहाय्याने एका ग्रामपंचायतीतील कामे पूर्ण करुन दुसऱ्या ग्रामपंचायतीच्या रस्त्यांची कामे सामूहिक सहकार्य पध्दतीने पूर्ण करणे शक्य आहे. याशिवाय गावातील एखादया कुटुंब समुहाला, ज्यात **१० - १५** जॉबकार्ड धारण करणारी कुटुंबे असतील (उदा. बचतगट इ.) त्यांना प्रति कुटुंब **१०० दिवसांची** श्रमाची कामे त्यांचेकडून सोपवून ते पूर्ण करुन घेणे शक्य आहे. कार्यकारी अभियंता (बांधकाम) जि. प. यांनी शाखा अभियंता / उप अभियंता यांचेवर संनियंत्रण करावयाचे आहे. आवश्यकता असल्यास मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी जिल्हा परिषदेतील इतर विभागाचे शाखा अभियंता / उप अभियंत्यांची मदत तांत्रिक मान्यतेसाठी घ्यावी.

iv) **ग्रामपंचायतअंतर्गत गांव तलाव / पाझर तलाव / सार्वजनिक पाणवठे - जलसाठे यामधील गाळ काढणे** - या कामांलाही महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत परवानगी आहे. प्रत्येक ग्रामपंचायतीच्या कार्यक्षेत्रात यावर्षी आवश्यक कामे जिल्हा परिषदेतील लघुपाटबंधारे / पाणी पुरवठा विभागाची तांत्रिक मान्यता घेवून ग्रामपंचायतींनी किमान रु. १० लाखांची कामे शेल्फवर घेवून तातडीने पावसाळयापूर्वी सुरु करावीत.

व लोकप्रतिनिधींच्या मार्गदर्शनाने ही योजना राज्यातील प्रत्येक गावांत राबविली जाईल व प्रत्येक गावांतील प्रत्येक कुटुंब यामध्ये सर्व बाबींची पूर्तता करुन सहभागी होईल यादृष्टीने जिल्हावार नियोजन करावे. या कार्यक्रमासाठी प्रशिक्षण देण्याची व्यवस्था रोजगार हमी योजना विभागातर्फे करण्यात आली आहे.

८) तसेच महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत सर्व शासन आदेश व परिपत्रके **egs.mkcl.org** या वेबसाईटवर उपलब्ध आहेत, त्यांचाही उपयोग योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी करावा.

९) हा कृती कार्यक्रम राबविण्यासाठी कालबध्द नियोजन करुन त्याचा साप्ताहिक अहवाल संगणकाद्वारे सोबताच्या प्रपत्रात नमूद दिवशी प्राप्त होतील यादृष्टीने मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांनी कार्यवाही करावी. ग्रामपंचायत स्तरावर या लक्ष्यानुसार नमूद केलेल्या कामांशिवाय इतर कामे घेतली असल्यास त्यांचीही माहिती अतिरिक्त रकान्यात अंतर्भूत करावी.

हे शासन परिपत्रक शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणकीय संकेतांक क्रमांक २०११०३२९१९४५१३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**(सुधीर ठाकरे)**
**सचिव**

**(व्ही. गिरीराज)**
**प्रधान सचिव**

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव.
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव.
मा. मंत्री व मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव.
मा.विधानसभा व विधानपरिषद सदस्य (सर्व)
मा.अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
सर्व मंत्रालयीन विभाग
विधी मंडळ ग्रंथालय, विधान भवन, मुंबई (१० प्रती)
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई (५ प्रती प्रसिध्दी साठी)
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी .
महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)

v) **वैयक्तिक विहीरी -** महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत **दारिद्रय रेषेखालील कुटुंबे, अनुसूचित जाती व जमातीची कुटुंबे, अल्प व अत्यल्प भूधारक आणि इंदिरा आवास योजनेंतर्गत लाभ** मिळणाऱ्या व्यक्ती वैयक्तिक विहीरींचा कार्यक्रम त्यांचे शेतात घेवू शकतात. यासाठी **रु. २ लक्षांपर्यंत** निधी उपलब्ध होतो. प्रत्येक ग्रामपंचायतींच्या कार्यक्षेत्रात रु. २० लाख किंमतीच्या किमान **१०** विहीरीं वर नमूद केलेल्या घटकांनी घेण्यासाठी ग्रामपंचायतीने व जिल्हा परिषदेच्या संबंधित विभागाने त्वरित कार्यवाही करावी. तांत्रिक मान्यता जिल्हयातील लघुपाटबंधारे / पाणी पुरवठा विभागाच्या संबंधित उप अभियंत्यांनी घ्यावी.

vi) **राजीव गांधी पंचायत भवन निर्माण -** केंद्र शासनाच्या ग्राम विकास मंत्रालयाने या महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत **रु. १० लाखापर्यंत** ग्रामपंचायतींतर्गत राजीव गांधी पंचायत भवन निर्माण करुनच त्याचा टाईप प्लॅन उपलब्ध करुन दिला जाईल. सर्व ग्रामपंचायतींनी त्यांच्या कार्यक्षेत्रात राजीव गांधी भवन निर्माण करण्याचे एक काम यावर्षी हाती घ्यावे. यासाठी तांत्रिक मान्यता घेवून शेल्फवर काम त्वरित दाखल करुन पुढील कार्यवाही करावी.

**३)** वरील प्रमाणे रु. ४० लाखाची कामे घेण्याचे **किमान लक्ष्य** यावर्षी (२०११-२०१२) प्रत्येक ग्रामपंचायतीला ठरवून देण्यात येत आहेत. याशिवाय महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत बसणारी इतर कामे ग्रामपंचायतींनी करण्यास प्रत्यवाय नाही. वरीलप्रमाणे कामे प्रत्येक ग्रामपंचायतीच्या कार्यक्षेत्रात सुरु होतील यादृष्टीने सक्षम अधिका-याची **तांत्रिक मान्यता घेणे,** ग्रामपंचायतीची **प्रशासकीय मान्यता** घेणे व ही **कामे शेल्फवर येण्यासाठी** गटविकास अधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी / अति.मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी आवश्यक कार्यवाही व समन्वय करावा.

**४)** याबाबत हे ही स्पष्ट करण्यात येते की, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत **अकुशल** व **कुशल** कामाचे **६० : ४०** हे प्रमाण **प्रत्येक कामागणिक** ठेवायचे नसून आर्थिक वर्षात पंचायत समिती स्तरावर एकूण सर्व कामांचा विचार करुन हे प्रमाण साधले जाईल अशी मुभा देण्यात आली आहे. त्यामुळे एखादया कामात जादा कुशल तर दुसरा अकुशल कामाचा भाग जास्त असणाऱ्या उद्दिष्टांशी जोडून अंतिमरित्या वर्षनिहाय हे ६०:४० प्रमाण साध्य

करण्याची मुभा आहे. त्यादृष्टीने गटविकास व जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी, अतिरिक्त मुख्य कार्यकारी यांनी याचे नियोजन व समन्वय त्यांचे स्तरावरुन करावा.

५) या कामाच्या अकुशल मंजूरीच्या कामात ग्रामपंचायतीतील कोणतीही अंगमेहनत करु इच्छिणारी व्यक्ती जॉबकार्ड घेवून त्यांचे कुटुंबातील सर्व व्यक्तींमार्फत **१०० दिवसांपर्यंत** श्रमाचे काम करु शकते. **केवळ भूमिहीन शेतमजूरांसाठी ही योजना आहे हा गैरसमज कृपया काढून टाकावा.** राज्यातील काही जिल्हयात बचतगटांनी एकत्र येवून अथवा संबंधित गावातील अथवा पंचक्रोशीतील युवकांनी एकत्रित येवून श्रमदानरुपाने या योजनेत अंगमेहनतीची कामे केली आहेत. आणि त्यांना मिळालेली मजूरी पुन्हा गावाच्या विकासासाठी प्रदान केलेली आहे. गावाच्या विकासासाठी यातून विविध सार्वजनिक सुविधांची निर्मिती करण्यात आली आहे.

६) वर नमूद केलेल्या कामांपैकी बरीचशी कामे पावसाळयापूर्वी पूर्वतयारी करुन प्रत्यक्ष सुरु करावयाची आहेत तर काही कामे पावसाळयामध्येही सुरु ठेवावी लागतील. आता पावसाळा सुरु होण्यास केवळ **७०** दिवस उरले आहेत. या ७० दिवसांत वर नमूद केल्याप्रमाणे **कामे निवडणे,** त्याचे **Plan Estimate तयार करणे,** जिल्हा परिषदेच्या, पंचायत समितीच्या संबंधित अधिकाऱ्यांकडून **तांत्रिक मान्यता घेणे,** ग्रामपंचायत अथवा गटविकास स्तरावर **प्रशासकीय मान्यता घेणे** आणि ही **सर्व कामे शेल्फवर घेवून** ती प्रत्यक्षात सुरु करुन ही कृती ७० दिवसांच्या कालावधीत करावयाची आहेत. त्यानंतर शेतीची कामे सुरु होणार असल्याने अकुशल कामासाठी मोठया प्रमाणावर मनुष्यबळ उपलब्ध होणार नाही. जे ग्रामस्थ श्रम करु इच्छितात परंतु ज्यांना जॉबकार्ड नाही त्यांना जॉबकार्ड देण्यासाठी मोहीम या काळामध्ये हाती घेवून त्यांच्या श्रमाचा उपयोग गावाच्या विकासासाठी करुन घेण्याचे नियोजनही मुख्य कार्यकारी अधिकारी, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, गटविकास अधिकारी व त्यांचे अधिनस्त तांत्रिक व प्रशासकीय यंत्रणेला करावे लागणार आहे.

७) याबाबत मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांनी जिल्हा परिषदेतील पदाधिकाऱ्यांना, जिल्हा परिषद सदस्यांना, गटविकास अधिकाऱ्यांना पंचायत समितीतील पदाधिकारी, सदस्य व ग्रामपंचायत स्तरावर **सरपंच, उप सरपंच, ग्रामपंचायत कमिटी** व ग्रामस्थांना ही योजना राबविणे महाराष्ट्रात किती आवश्यक आहे, यातून ग्रामीण महाराष्ट्राचा कसा कायापालट होवू शकतो, याबाबतची माहिती देणे आवश्यक आहे. यासाठी आवश्यक माहिती शिबीरे व सभा घेण्याची कार्यवाही करावी